साथरोग नियंत्रण व कोविड-१९ प्रार्दुभाव नियंत्रणासाठी औषधे खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
शासन निर्णय क्रमांकः कोरोना-२०२०/प्र.क्र.७३/आरोग्य-५
नविन मंत्रालय, गोकुळदास तेजपाल रूग्णालय कंपांउड,
कॉम्प्लेक्स बिल्डिंग, १० मजला, मुंबई ४०० ००१.
दिनांक : २४ मार्च,२०२०.

संदर्भ-

१) सहसंचालक, आरोग्य सेवा ( हिवताप,हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे यांचे पत्र क्रमांक ससंआसे/ साथरोग/औषध खरेदी/प्रशासकीय मान्यता/कक्ष-५८/३११२-१८/२०२०, दिनांक २२.०३.२०२०.

२) शासन पत्र, सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक करोना २०२०/प्र.क्र. ५८/आरोग्य ५, दि.२४ मार्च,२०२०

प्रस्तावना -

साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत जलजन्य आजार, अतिसार, गॅस्ट्रो, विषमज्वर, जलजन्य काविळ, लेप्टोस्पायरोसीस, स्वाईन फ्ल्यू इत्यादी आजाराच्या नियंत्रणासाठी औषधे खरेदी करण्यात येते. सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे या कार्यालयामार्फत राज्यातील साथरोग परिस्थितीचे संनियंत्रण केले जाते. सद्य:स्थितीत या आजारांबरोबरच कोविड-१९ या विषाणूमुळे उद्भवलेल्या आजारावर देखील तातडीने औषधे खरेदी करणे आवश्यक झाले आहे व ही बाब देखील साथरोग नियंत्रण कार्यक्रमांतर्गत येत असल्याने साथरोग नियंत्रण कार्यक्रमांकरिता औषधे खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत संदर्भीय पत्रान्वये प्रस्ताव प्राप्त झाला आहे. त्यानुसार सदरहु औषधे तातडीने खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

सहसंचालक आरोग्य सेवा (हि ह व ज रो) यांच्या संदर्भ क्र.१मध्ये नमूद केलेल्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने साथरोग नियंत्रण कार्यक्रमांकरिता (साथरोग व कोविड-१९प्रार्दुभावाने उद्भवलेल्या उपचारास्तव) सोबतच्या विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या (रु.१,०१,६०,०००,/- च्या मर्यादेत) रु. एक कोटी एक लाख साठ हजार फक्त इतक्या रकमेच्या मर्यादेत तातडीने औषधांची खरेदी करण्यासाठी खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे:-

अटी:-

१) सदरहू औषधांची आवश्यकता/मागणी याची शहानिशा/खातरजमा करण्यात यावी.

२) सदर बाबींचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती/अधिकारी यांनी) मान्य केलेल्या विनिर्देशानूसार असावेत. तसेच सदर

तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच या बाबींची खरेदी करण्यात यावी.

३) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींची पुरवठापूर्व/ पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample inspection) करुन उचित व योग्य विनिर्देश असलेल्या वस्तुंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

४) सदरहू खरेदीसाठी होणारा खर्च खालील लेखाशिर्षाअंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा:-

अ) "२२१०, वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य- राज्य योजनांतर्गत योजना- (०१) (४५) साथरोग नियंत्रण कार्यक्रम- २१, पुरवठा व सामग्री (**२२१० ४२८६**)".

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

६) सदर खरेदीची द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

७) संपुर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

८) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दि.१७.०४.१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४, नियम क्रमांक ७ समोरील स्तंभ क्रमांक ६ येथील अटींची पुर्तता करण्यात यावी.

९) प्रस्तावित खरेदी ही कोविड-१९ च्या प्रार्दुभावाने झालेल्या साथरोगाच्या उपचारास्तव तातडीने करणे आवश्यक असल्याने संदर्भ क्र.२ मध्ये नमूद केलेल्या पत्रानूसार हाफकीन अंतर्गत खरेदी कक्ष / बृहन्मुबई महानगरपालीका / केंद्र शासन उपक्रम किंवा अन्य राज्य शासनाच्या मेडीकल सर्व्हीस कार्पोरेशनच्या दर सूचीनूसार न्यूनतम दरावर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**उपरोक्त नमूद अटींची पुर्तता करण्याची संपुर्ण जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुख यांची तसेच आरोग्य सेवा संचालनालयाची राहील तसेच आवश्यकतेपेक्षा जास्त खरेदी झाल्यास व विनावापर पडून राहिल्यास, मागणी नोंदविणारे संबंधित अधिकारी जबाबदार असतील.**

२. शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग दोन मधील अ.क्र.४, नियम क्र. ७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानूसार सदरहू प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( डॉ.प्रदीप व्यास)

**प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
२) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
३) सहसंचालक, आरोग्य सेवा (खरेदी कक्ष), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४) सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन) , आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
५) सहसंचालक, आरोग्य सेवा ( हिवताप, हत्तीरोग व जलजन्य रोग), पुणे
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता), नागपूर.
८) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०) निवडनस्ती (आरोग्य-५/८)

